**अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीसाठी शासनाकडे अर्ज केलेल्या मृत शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबास शासकीय निवासस्थानात रहाण्यास दयावयाच्या मुदतवाढीचा कालावधी निश्चित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. शानिवा-१०१०/विसआ/प्र.क्र.७४७/२३-अ**
**दिनांक : ११ एप्रिल, २०११.**

पहा - १) शासन निर्णय क्र. शानिवा-१०९५/प्र.क्र.८०७/९५/२३अ, दि.१०.९.१९९६.
२) शासन निर्णय क्र. शानिवा-२५०६/प्र.क्र.७५८/२००६/२३अ, दि. १.११.२००६.

**पार्श्वभूमी :**

शासकीय निवासस्थानात रहाणा-या अधिकारी / कर्मचारी यांचे शासन सेवेत असताना निधन झाल्यास व त्यांच्या पाल्याने अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीसाठी शासनाकडे अर्ज केला असल्यास अशा अधिकारी /कर्मचा-याच्या कुटुंबास शासकीय निवासस्थानात रहाण्यास दयावयाच्या मुदतवाढीचा कालावधी निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या बाबत सांगोपांग विचार करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :**

शासकीय निवासस्थानात रहाणा-या अधिकारी / कर्मचारी यांचे शासन सेवेत असताना निधन झाले असेल व त्याच्या पाल्याने अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी शासनाकडे अर्ज केला असेल आणि त्याचे नाव अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठीच्या विभागाच्या प्रतिक्षायादीत समाविष्ट झाले असेल तर अशा कर्मचा-याच्या कुटुंबास त्यांचे वास्तव्य असलेल्या संबधित मृत शासकीय कर्मचा-याच्या शासकिय निवासस्थानात रहाण्यास निधनाच्या दिनांकापासून ३ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर ६ महिने किंवा शैक्षणिक वर्ष संपेपर्यंत यापैकी जे अधिक असेल अशा कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात यावी. या कालावधीसाठी खालीलप्रमाणे भाडेदर आकारणी करण्यात यावी::-

| | | |
|---|---|---|
| अ) पहिले तीन महिने | - | सवलतीच्या दराने |
| ब) त्यापुढील सहा महिने किंवा शैक्षणिक वर्ष संपेपर्यंत यापैकी जे अधिक असेल त्या कालावधीकरिता | - | अनुज्ञप्ती शुल्काच्या दुप्पट दराने. |

मात्र उपरोक्त शैक्षणिक वर्ष संपेपर्यंतची मुदतवाढ ज्या मृत शासकीय अधिकारी / कर्मचा-याचे पाल्य शालेय अथवा महाविद्यालयीन शिक्षण घेत असतील अशाच प्रकरणी लागू ठरेल.

२. वरील निर्णयाच्या परिणामी या विभागाच्या दि.१०.९.९६ च्या शासन निर्णयातील, शासन सेवेत असताना अकाली निधन झालेल्या अधिकारी / कर्मचा-यांच्या कुटुंबियांना मुदतवाढ देण्याबाबतची व शुल्क आकारण्याबाबतची तरतूद अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठीच्या प्रकरणांपुरती सुधारित झाली असल्याचे समजण्यात यावे.

३. सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०४१११२०३३७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( प्र. या. बैले )**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

प्रति:

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई.
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र , नागपूर.
३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई
४. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र, नागपूर
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. राज्यपालांचे सचिव
७. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
८. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
९. मुख्यमंत्री/ उपमुख्यमंत्री/ सर्व मंत्री/ सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* १०. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई ( ५ प्रती)
* ११. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (५ प्रती)
* १२. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. मुख्य अभियंता, प्रादेशिक (सा.बां.) विभाग, मुंबई, २५, मर्झबान पथ, मुंबई
१६. अधिक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई
१७. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
१८. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, वरळी, मुंबई
१९. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई
२०. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबबई, जुने जकात घर, मुंबई
* २१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२२. अधिदान व लेखा कार्यालय
२३. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
२४. सर्व मंत्रालयीन विभाग
२५. सामान्य प्रशासन विभागामधील सर्व कार्यासने
२६. निवडनस्ती.

*** (पत्राने)**